चाकण शहरातील रा.मा.क्र.१२७ कि.मी.०/०० ते २/३०० लांबी चाकण नगर परिषदेकडे हस्तांतरित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- रवियो-२०१६/प्र.क्र.७७/नियो.-२**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- १८ फेब्रुवारी, २०२०.

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र क्र.- जा.क्र.मुअ (पुणे)/का-२/रेशा/७८/२९९८/२०१९, दिनांक १२/०७/२०१९.
२) शासन निर्णय क्रमांक-आरबीडी-१०८१/ ८७१/ रस्ते-७, दि.०९/०३/२००१.

**प्रस्तावना :-**

जुन्या पुणे नाशिक महामार्गाचा चाकण शहरातील रा.मा.क्र.१२७ कि.मी.०/०० ते २/३०० ही सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारित असलेली रस्ता लांबी नगरपरिषद चाकण यांच्या मागणीच्या अनुषंगाने देखभाल व दुरुस्तीकरिता चाकण नगर परिषदेकडे हस्तांतरित करण्याचा प्रस्ताव मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,पुणे यांचेकडून शासनास प्राप्त झाला आहे. त्यानुषंगाने सदरचा रस्ता हस्तांतरित करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचा प्रस्ताव तसेच संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक-आरबीडी-१०८१/ ८७१/ रस्ते-७, दि.०९/०३/२००१ मधील टिप ५ मधील तरतूद व खालील अटी व शर्ती विचारात घेऊन

१) सदरच्या रस्त्यालगतच्या बांधकामास नगरपरिषदेकडून परवानगी देताना महाराष्ट्र शासनाने नोव्हेंबर २०१३ ला मंजूर केलेल्या अ, ब, क नगरपरिषद नियमावलीनुसार व नगरविकास विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या प्रचलित शासन निर्णयानुसार योग्य अंतरे ठेवून परवानगी देण्यात येईल.

२) सदरच्या रस्त्यावर अतिक्रमणे होणार नाहीत याची दक्षता नगरपरिषदेकडून घेण्यात येईल.

३) सदरच्या रस्त्याची देखभाल दुरूस्ती योग्यप्रकारे करून तो वाहतूक योग्य ठेवण्यात येईल व याकरिता येणारा संपूर्ण खर्च नगरपरिषदेकडून करण्यात येईल.

४) सदरच्या रस्त्याबाबतची सर्व न्यायालयीन प्रकरणे चाकण नगरपरिषदेकडे हस्तांतरित करण्यात येतील. ती सर्व न्यायालयीन प्रकरणे चाकण नगरपरिषदेने हाताळावीत.

चाकण शहरातील रा.मा.क्र.१२७ कि.मी.०/०० ते २/३०० लांबी चाकण नगर परिषदेकडे अवर्गीकृत करण्यात येत असून, हस्तांतरणाची कार्यवाही क्षेत्रीय स्तरावर उपरोक्त अटी व शर्तींच्या अधीनतेने करण्यात यावी.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यांत आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२००२१८१४४८०२९४१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2020.02.18 14:50:01 +05'30'

**( प्रशांत पाटील )**

अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

२) विभागीय आयुक्त, पुणे.

३) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, पुणे (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करण्यात यावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

४) जिल्हाधिकारी, पुणे.

५) मुख्याधिकारी, नगरपरिषद चाकण.

६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे.

७) कार्यकारी अभियंता, (सा.बां.) जिल्हा परिषद, पुणे.

८) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई

९) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

११) निवडनस्ती.